**प्रशासकीय मान्यता-**
**महाराष्ट्र ज्युडीशिअल अकॅडमी व इंडियन मेडिएशन सेंटर व ट्रेनिंग इन्स्टिटयूट इमारतीच्या टप्पा क्र.२ चे बांधकाम..........**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक सीसीबी-१११३/प्र.क्र.१९८/का-१३**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २४ जानेवारी २०२०

**वाचा :-** १) मा.प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्रमांक :- बीडब्ल्यू-६१४१/२०१०, दिनांक २५ जुलै, २०१९ चे पत्र

**प्रस्तावना-:**

उपरोक्त संदर्भाधिन क्र १.च्या पत्रान्वये, महाराष्ट्र ज्युडीशिअल अकॅडमी व इंडियन मेडिएशन सेंटर व ट्रेनिंग इन्स्टिटयूट इमारतीच्या टप्पा क्र.२ चे बांधकाम करण्याबाबतचा प्रस्ताव मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडून शासनास सादर करण्यात आला आहे. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

महाराष्ट्र ज्युडीशिअल अकॅडमी व इंडियन मेडिएशन सेंटर व ट्रेनिंग इन्स्टिटयूट इमारतीच्या टप्पा क्र.२ चे बांधकाम करण्याकरीता रु.५३,८८,०४,८८०/- (रुपये त्रेप्पन्न लाख अठ्ठयाऐंशी लाख चार हजार आठशे ऐंशी फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | तपशिल | प्रशासकीय मान्यता रक्कम रुपयात |
|---|---|---|
| १ | संचालकांचा बंगला (स्टील्ट+२) | १,६६,०६,३८०.०० |
| २ | सह व अतिरिक्त संचालक बंगला (स्टील्ट+३) | ३,८९,९२,५६०.०० |
| ३ | निवासस्थाने टाईप-१ (तिसरा ते पाचवा मजला) | १,६७,९५,६२०.०० |
| ४ | निवासस्थाने टाईप-३ (तिसरा ते पाचवा मजला) | १,१६,३४,८४०.०० |
| ५ | निवासस्थाने टाईप-३ (तळ+४ मजले) | १,९३,९१,४००.०० |
| ६ | निवासस्थाने टाईप-४ (दुसरा व तिसरा मजला) | १,१४,०२,८५०.०० |
| ७ | निवासस्थाने टाईप-५ (तिसरा ते पाचवा मजला) | २,५६,४३,१६०.०० |
| ८ | गेस्ट हाऊस (तिसरा व चौथा मजला) | ६,९५,५९,६६५.०० |
| ९ | विद्यूतीकरण ( अग्नीशमन यंत्रणासहीत) | १२,४४,०९,९१४.०० |
| १० | पाणीपुरवठा व मलनि:स्सारण | १,०५,०१,३२४.०० |
| ११ | आवारभिंत | १,५०,००,०००.०० |
| १२ | अंतर्गत रस्ते | ७५,००,०००.०० |
| १३ | फर्निचर | ३,६८,४६,७५०.०० |
| १४ | भूविकास | ४७,६४,८६०.०० |

| | | |
|---|---|---|
| १५ | रेन वॉटर हार्वेस्टींग | २१,००,२६५.०० |
| १६ | सी.सी.ड्रेन | १,००,००,०००.०० |
| १७ | बागबगिचा व लॅन्डस्केपींग | ५०,००,०००.०० |
| | एकूण खर्च रुपये:- | ४२,६१,४९,५८८.०० |
| १८ | आकस्मिक निधी | ८४,०१,०५९.०० |
| १९ | स्थानिक प्राधिकरणांकडून परवानगीसाठी | १,०५,०१,३२४.०० |
| २० | वस्तु व सेवा कर | ५,११,३७,९५१.०० |
| २१ | भाववाढ | ४,२६,१४,९५९.०० |
| | एकूण प्रकल्प खर्च | ५३,८८,०४,८८०.०० |
| | म्हणजेच एकूण रुपये लाखात:- | ५३,८८.०५ |

ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३ / प्र.क्र.१७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

इ) सावर्जनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दि.०७.०७.२०17 अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

**३.** या प्रित्यर्थ होणारा खर्च “मागणी क्र.एच-७, ४२१६- गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१, शासकीय निवासी इमारती - ७००, इतर गृहनिर्माण- (०१) न्यायदान- केंद्र पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा) (०१)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६०२९१) व केंद्र हिस्सा (०३) (०४) मोठी बांधकामे-५३ मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६०५२२)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ४८०/२०१८/ इमा-२, दिनांक ११ एप्रिल २०१८ व नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ९४/१४४३, दिनांक १५ मे २०१८, वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५ दिनांक ६ जानेवारी २०१९ व मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीच्या दिनांक १० जून २०१९ रोजीच्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेनुसार आणि वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम-भाग-२, दि.१७ एप्रिल,२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पांच अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र .१३४ अनुसार प्रशासकीय

विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक. २०२००१२४१५१४५६७११२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Anand Bharat Hodawadekar

Digitally signed by Anand Bharat Hodawadekar
DN: c=IN, o=Bombay High Court, ou=Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=73fc506cde4a9660a8d8a1bbbb09770620a8e0483814d28fc8eeee2d08fdc44d, cn=Anand Bharat Hodawadekar
Date: 2020.01.24 14:59:03 +05'30'

**(आनंद भारत होडावडेकर)**
**उप विधि सल्लागार-नि-उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४. महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
५. प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई
६. उप प्रबंधक बी (डब्ल्यू) शाखा, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
७. संचालक, महाराष्ट्र ज्युडीशिअल अकॅडमी व इंडियन मेडिएशन सेंटर व ट्रेनिंग इन्स्टिटयूट, उत्तन, भाईंदर (प), ठाणे-४०११०६
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन, मुंबई/नागपूर,
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण
१०. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे
११. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, ठाणे (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
१३. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४. कक्ष अधिकारी, व्यय-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१५. कक्ष अधिकारी , १४४३, नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१६. अपर आयुक्त व सदस्य सचिव, मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय परिसर, औरंगाबाद.
१७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१८. कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२,विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१९. निवड नस्ती/संग्रहार्थ.